**प्रथिनयुक्त पशुजन्य उत्पादनांमध्ये भरीव वाढ करण्याची राष्ट्रीय मोहिम-** शेळी पालनाद्वारे मांस उत्पादनात वाढ करणे आणि पारंपारिक शेळी पालन पध्दतीमध्ये शेळया/बोकड यांची मांस निर्मितीची क्षमता व त्या अन्वये उत्पादकता वाढविणे या योजनेस प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,

शासन निर्णय क्रमांक पविआ-२०११/प्र.क्र.३३८/पदुम-३

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२

दिनांक ०४ नोव्हेंबर, २०११

**वाचाः**

**१.** केंद्र शासनाचे अर्धशासकीय पत्र क्र. ४८-१६/२०११-टि एस (मेंढी) दि. ०१/०६/२०११.

**२.** शासन निर्णय क्र. राकृवि-२०११/प्र.क्र.६६/राकृवियो कक्ष, मंत्रालय दि. ०६/०९/२०११.

**३.** राज्यस्तरीय मंजूरी समितीच्या दि. १६/०८/२०११ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त क्र. आरकेव्ही-२०११/सीआर-६६/आरकेव्हीवाय सेल, मंत्रालय, मुंबई-३२ दि. २९/०८/२०११.

**प्रस्तावनाः**

केंद्र शासनाने प्रथिनयुक्त पशुजन्य उत्पादनांमध्ये भरीव वाढ करण्यासाठी राष्ट्रीय मोहिम (नॅशनल मिशन फॉर प्रोटीन सप्लिमेंटस्) राबविण्याचे निश्चित केले आहे. या मोहिमे अंतर्गत निवड केलेल्या १० राज्यांमध्ये (अ) शेळी पालनाद्वारे मांस उत्पादनात वाढ करणे आणि (ब) पारंपारिक शेळी पालन पध्दतीमध्ये शेळया/बोकड यांची मांस निर्मितीची क्षमता व त्या अन्वये उत्पादकता वाढविणे या योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने मार्गदर्शक तत्वे कळविलेली आहेत. केंद्र शासनाने या योजना राबविण्यासाठी निवडलेल्या दहा राज्यांमध्ये महाराष्ट्र राज्याचाही समावेश आहे.

केंद्र शासनाच्या सुचनांनुसार नॅशनल मिशन फॉर प्रोटीन सप्लिमेंटस् अंतर्गत वरील दोन्ही योजना राष्ट्रीय कृषि्र विकास योजनेच्या निधीतून राबवावयाच्या असून त्यानुसार या योजनांच्या प्रकल्प प्रस्तावास राज्यस्तरीय मंजूरी समितीने दि. १६/०८/२०११ रोजी झालेल्या बैठकीत मंजूरी प्रदान केली आहे. या पार्श्वभुमीवर उक्त योजना राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या निधीतून वित्तीय वर्ष २०११-१२ मध्ये राज्यात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः**

केंद्र शासनाने प्रथिनयुक्त पशुजन्य उत्पादनांमध्ये भरीव वाढ करण्यासाठी राबविण्याचे निर्देशित केलेल्या राष्ट्रीय मोहिमेमध्ये (अ) शेळी पालनाद्वारे मांस उत्पादनात वाढ करणे आणि (ब) पारंपारिक शेळी पालन पध्दतीमध्ये शेळया/बोकड यांची मांस निर्मितीची क्षमता व त्या अन्वये उत्पादकता वाढविणे या योजना राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या निधीतून वित्तीय वर्ष २०११-१२ मध्ये राबविण्यासाठी शासनाची प्रशासकीय व वित्तीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

उक्त योजना खाली नमूद केलेली खर्चाची प्रमाणके आणि अनुषंगिक तपशिलानुसार राबविण्यात यावी.

**(अ) शेळी पालनाद्वारे मांस उत्पादनात वाढ करणे:**

योजनेच्या अंमलबजावणीचे जिल्हे- बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर हे राहतील.

या योजनेअंतर्गत अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती आणि दारिद्र्य रेषेखालील लाभार्थ्यांचीच निवड करुन त्यांना तीन महिने वयाच्या शेळीच्या करडांचे गट संगोपन करण्यासाठी १०० टक्के अनुदानावर वाटप करण्यात यावेत. करडांच्या गटाचा आकार ४० (३८ मादी करडे आणि २ नर करडे) / ६० (५७ मादी करडे आणि ३ नर करडे) / ८० (७६ मादी करडे आणि ४ नर करडे) / १०० (९५ मादी करडे आणि ५ नर करडे) याप्रमाणे राहील. प्रत्येक मादी करडाची किंमत रु. १२००/- तर पाच महिने वयाच्या नर करडाची किंमत रु. १८००/- राहील. यानुसार वरील बाबी आणि त्याव्यतिरीक्त योजनेमध्ये लाभार्थींना द्यावयाच्या अन्य निविष्ठा व त्यांचे प्रित्यर्थ्य खर्चाची प्रमाणके यांचा तपशिल खाली दिल्यानुसार राहील.

| अ. क्र. | बाब | गटाचा आकार (३८ मादी करडे आणि २ नर करडे) | गटाचा आकार (५७ मादी करडे आणि ३ नर करडे) | गटाचा आकार (७६ मादी करडे आणि ४ नर करडे) | गटाचा आकार (९५ मादी करडे आणि ५ नर करडे) |
|---|---|---|---|---|---|
| १ | ३ महिने वयाच्या मादी करडांची किंमत प्रत्येकी रु. १२००/- प्रमाणे | रु. ४५,६००/- | रु. ६८,४००/- | रु. ९१,२००/- | रु. १,१४,०००/- |
| २ | ५ महिने वयाच्या नर करडांची किंमत प्रत्येकी रु. १८००/- प्रमाणे | रु. ३,६००/- | रु. ५,४००/- | रु. ७,२००/- | रु. ९,०००/- |
| ३ | स्थानिक साहित्य वापरुन करडांसाठी शेडचे बांधकाम रु. ५०/- प्रति स्क्वे. फुट दराने | (२४० स्क्वे. फुट) रु. १२,०००/- | (३६० स्क्वे. फुट) रु. १८,०००/- | (४८० स्क्वे. फुट) रु. २४,०००/- | (६०० स्क्वे. फुट) रु. ३०,०००/- |
| ४ | औषधे व लसी प्रत्येकी रु. ७०/- प्रमाणे | रु. २,८००/- | रु. ४,२००/- | रु. ५,६००/- | रु. ७,०००/- |
| ५ | २ महिन्यासाठी खाद्य २५० ग्रॅम प्रतिदिन प्रति करडु रु. १०/- प्रति किलोप्रमाणे (रु. १५०/- प्रति करडु) | रु. ६,०००/- | रु. ९,०००/- | रु. १२,०००/- | रु. १५,०००/- |
| ६ | खाद्याची भांडी प्रत्येकी २० करडांसाठी १ व प्रति नग रु. १,८००/- या दराने | (खाद्याची २ भांडी) रु. ३,६००/- | (खाद्याची ३ भांडी) रु. ५,४००/- | (खाद्याची ४ भांडी) रु. ७,२००/- | (खाद्याची ५ भांडी) रु. ९,०००/- |
| ७ | मुरघास खड्डा | -- | रु. ५०,०००/- | रु. ५०,०००/- | रु. ५०,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | करण्यासाठी अनुदान रु. ५०,०००/- | | | | |
| ८ | करडांचा विमा किंमतीच्या २ टक्के दराने | रु. ९८४/- | रु. १,४७६/- | रु. १,९६८/- | रु. २,४६०/- |
| ९ | वैरण उत्पादनासाठी वैरणीच्या बियाणांचा पुरवठा (सदर निविष्ठा अन्य मंजूर योजनेमधून पुरविण्यात येईल) | रु. २,४००/- | रु. ३,०००/- | रु. ४,८००/- | रु. ६,०००/- |
| | **एकुण** | **रु. ७४,५८४/-** | **रु. १,६१,८७६/-** | **रु. १,९९,१६८/-** | **रु. २,३६,४६०/-** |
| | | **रु. ७५,०००/-** | **रु. १,६२,०००/-** | **रु. १,९९,०००/-** | **रु. २,३६,०००/-** |

वरील तपशिलानुसार लाभार्थींना ४० / ६० / ८० / १०० करडांचे गट वाटप करण्यासाठी योजनेमध्ये १०० टक्के अनुदान अनुज्ञेय राहील.

या योजनेअंतर्गत भौतिक उद्दिष्ट व त्यानुसार आवश्यक तरतूदींचा तपशिल खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | गटाचा आकार | लाभार्थींची संख्या | तरतूद (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| **१** | ३८ मादी करडे आणि २ नर करडे | १०० | ७५.०० |
| **२** | ५७ मादी करडे आणि ३ नर करडे | १९ | ३०.७८ |
| **३** | ७६ मादी करडे आणि ४ नर करडे | ८ | १५.९२ |
| **४** | ९५ मादी करडे आणि ५ नर करडे | १२ | २८.३२ |
| | | **१३९** | **१५०.०२** |
| | | | **१५०.००** |

**लाभार्थी निवडीचे निकषः**

**१.** लाभार्थी अनुसुचित जाती/जमातीचा किंवा दारिद्र्य रेषेखालीलच असावा.

**२.** लाभार्थ्याने किमान एक वर्षाच्या कालावधीकरीता कमीत कमी १० शेळ्यांचे संगोपन केलेले असावे.

**३.** लाभार्थ्याकडे योजनेअंतर्गत पुरवठा केलेल्या करडांचे संगोपनासाठी / रात्रीच्या निवाऱ्यासाठी आवश्यक शेड बांधकाम करण्याकरीता पुरेशी जागा असावी.

**४.** लाभार्थ्याने मागील ३ वर्षांच्या कालावधीत पशुसंवर्धन विभागाच्या वैयक्तिक लाभाच्या योजनेचा लाभ घेतलेला नसावा.

लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समितीचे गठण करण्यात यावे.

**१.** जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त : अध्यक्ष

**२.** जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी : सदस्य

**३.** जिल्हा समाज कल्याण अधिकारी : सदस्य

**४.** सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन : सदस्य सचिव
जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांचे कार्यालय

या योजनेअंतर्गत बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर या जिल्ह्यांमधील ग्रामीण लोकसंख्या आणि अनुसुचित जाती / जमातींच्या लाभार्थ्यांची लोकसंख्या विचारात घेवून त्यानुसार जिल्हानिहाय लाभार्थ्यांचे भौतिक उद्दिष्ट आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य यांनी परिगणित करावे व त्यानुसार सर्व संबंधितांना उद्दिष्ट कळविण्यात यावे.

संबंधित जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त या योजनेचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. करडांची खरेदी करण्यासाठी खाली नमुद केल्याप्रमाणे खरेदी समितीचे गठण करण्यात यावे.

**१.** पशुधन विकास अधिकारी (विस्तार), पंचायत समिती

**२.** कार्यक्षेत्रातील पशुवैद्यकिय संस्थेचे प्रभारी प्रमुख- सहा. आयुक्त पशुसंवर्धन/पशुधन विकास अधिकारी/सहा. पशुधन विकास अधिकारी/पशुधन पर्यवेक्षक

**३.** विमा कंपनीचे प्रतिनीधी

**४.** लाभार्थी

लाभार्थी ज्या पशुवैद्यकिय संस्थेच्या कार्यक्षेत्रातील असेल त्या पशुवैद्यकिय संस्थेने संबंधित लाभार्थ्याला पुरवठा केलेल्या गटाचा पुर्ण पाठपुरावा करावा तसेच करडांना / शेळयांना आवश्यकतेनुसार औषधोपचार व लसीकरण करावे.

**(ब) पारंपारिक शेळी पालन पध्दतीमध्ये शेळया/बोकड यांची मांस निर्मितीची क्षमता व त्या अन्वये उत्पादकता वाढविणे**

योजनेच्या अंमलबजावणीचे जिल्हे- बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर हे राहतील.

या योजनेअंतर्गत वरील सर्व जिल्ह्यांमध्ये प्रत्येकी दोन क्लस्टर्स निवडण्यात यावेत. प्रत्येक क्लस्टरमध्ये १० कि. मी. परिघातील आठ ते दहा गावांचा समावेश राहील. प्रत्येक क्लस्टरमध्ये समाविष्ट असलेल्या सदरच्या गावांमध्ये मिळून एकुण शेळया व बोकड यांची संख्या किमान २००० एवढी असणे आवश्यक राहील. अशा रितीने निवडलेल्या प्रत्येक क्लस्टरकरीता एक गोट स्काऊटची (शेळया चारणारा / गुराखी) नियुक्ती करण्यात यावी. या गोट स्काऊट / गुराख्याने त्याला नेमून दिलेल्या क्लस्टरमधील आठ ते दहा गावांतील कमीतकमी २००० शेळयांची काळजी घेणे व शेळयांचे स्वास्थ्य रक्षण, शास्त्रीय पध्दतीने पैदास करण्यासाठी शेळीपालकांचे सातत्याने संपर्कात राहुन सदरची जबाबदारी पार पाडावी. गोट स्काऊट / गुराख्याने नेमून दिलेल्या क्लस्टरमधील गावांतील किमान १५० ते २०० शेळीपालक / शेळी पालन करणाऱ्या कुटुंबांची आणि त्यांचेकडील शेळयांच्या संख्येची नोंदणी करणे आवश्यक राहील. तसेच या सर्व शेळीपालकांकडील शेळयांना संतुलित शेळी खाद्य पुरवठा करणे (दोन महिने कालावधीसाठी), क्षेत्रिय गरजांनुसार विवक्षित घटकद्रव्ये असलेले क्षारमिश्रण पुरवठा करणे, जंतनाशक औषधे पाजणे, रोग प्रतिबंधक लसीकरण करणे आणि या शेळयांची शास्त्रीय पध्दतीने सुधारीत पैदास करणे ही कामे गोट स्काऊटने पुर्ण करावीत. यास्तव या गोट स्काऊटला दरमहा रु. ३,०००/- प्रमाणे एकुण १८ महिन्यांच्या कालावधीसाठी मानधन देय राहील. अशा रितीने उपरोक्त १० जिल्ह्यातील २० क्लस्टर्स निवडून त्यांचेकरिता २० गोट स्काऊट नेमण्यात यावेत. या बाबींनुसार सदर योजनेखाली अनुज्ञेय खर्चाच्या बाबी आणि त्यांचे प्रित्यर्थ्य खर्चाची प्रमाणके यांचा तपशिल खाली दिल्यानुसार राहील.

| अ.क्र. | बाब | किंमत |
|---|---|---|
| १ | २ महिन्यांकरीता २००० शेळ्यांना संतुलित शेळी खाद्याचा पुरवठा करणे रु. १०/- प्रति कि. ग्रॅ. प्रमाणे | रु. ३,००,०००/- |
| २ | औषधे व लसी प्रत्येकी रु. ७०/- प्रमाणे २००० शेळ्यांकरिता | रु. १,४०,०००/- |
| ३ | गोट स्काऊट यांना प्रशिक्षण | रु. ३,०००/- |
| ४ | १८ महिन्यांसाठी गोट स्काऊट यांना मानधन देणे रु. ३,०००/- प्रतिमहा | रु. ५४,०००/- |
| ५ | स्टेशनरी, नोंदवह्या, टॅगस्, प्रचार व प्रसिध्दी | रु. ३,०००/- |
| | **एकुण** | **रु. ५,००,०००/-** |

उपरोक्त तपशिलानुसार प्रत्येक क्लस्टरसाठी रु. ५.०० लाख या मंजूर प्रमाणकानुसार बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर जिल्ह्यांतील एकुण २० क्लस्टर्ससाठी रु. १००.०० लाख एवढा खर्च करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

**गोट स्काऊट निवडीचे निकषः**

**१.** गोट स्काऊट म्हणून काम करणारा उमेदवार संबंधित क्लस्टरमधील गावांपैकी एका गावाची स्थानिक रहिवासी असणे आवश्यक राहील.

**२.** गोट स्काऊट म्हणून काम करणाऱ्या उमेदवाराकडे किमान इयत्ता ७ वी उत्तीर्ण ही शैक्षणिक आर्हता असणे आवश्यक आहे.

**३.** गोट स्काऊट म्हणून काम करण्यासाठी सदर उमेदवाराने कमीतकमी एक वर्ष कालावधीसाठी किमान १० शेळ्यांचे संगोपन केलेले असणे आवश्यक राहील.

**४.** उमेदवार अनुसुचित जाती / जमाती किंवा दारिद्र्य रेषेखालील असणे आवश्यक.

**क्लस्टर निवडीचे निकषः**

**१.** क्लस्टरमध्ये शक्यतो ८ ते १० गावांचा (एका तालुक्यातील वा एकापेक्षा जास्ता तालुक्यांतील) समावेश असावा. ही गावे १० कि.मी. परिघाच्या मर्यादेत असावीत.

**२.** एका क्लस्टरमधील निवडलेल्या दहा गावांमध्ये किमान १५० ते २०० शेळीपालक असणे आवश्यक राहील. हे शेळीपालक शक्यतो दारिद्र्य रेषेखालील अथवा अनुसुचित जाती / जमातींचे असावेत.

गोट स्काऊटची व क्लस्टरची निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठित करण्यात यावी.

**१.** जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त : अध्यक्ष
**२.** जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी : सदस्य
**३.** जिल्हा समाज कल्याण अधिकारी : सदस्य
**४.** प्रकल्प संचालक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प : सदस्य
**५.** सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन : सदस्य सचिव
जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांचे कार्यालय

संबंधित जिल्ह्यचे जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त या योजनेचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. ते सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद पशुसंवर्धन विभागाच्या पंचायत समित्या आणि पशुवैद्यकिय

दवाखान्यांवरील कर्मचारीवृंदाच्या सहाय्याने आणि आत्मा, इच्छुक अशासकीय सेवाभावी संस्था आणि शेतकरी स्वारस्य गटांना योजनेच्या अंमलबजावणीमध्ये सहभागी करुन घेतील.

उपरोक्त (अ) शेळी पालनाद्वारे मांस उत्पादनात वाढ करणे आणि (ब) पारंपारिक शेळी पालन पध्दतीमध्ये शेळ्या/बोकड यांची मांस निर्मितीची क्षमता व त्या अन्वये उत्पादकता वाढविणे या दोन्ही योजनांचे प्रादेशिक स्तरावर प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, अमरावती, नागपुर आणि लातुर विभाग संनियंत्रण करतील आणि राज्यस्तरावर आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य संनियंत्रण करतील.

योजनेचा अंमलबजावणी व मुल्यमापन अहवाल प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, अमरावती, नागपुर आणि लातुर विभाग यांचेमार्फत आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०१ यांना सादर करावा.

हा शासन निर्णय मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय मंजूरी समितीच्या बैठकीत दि.१६.८.२०११ रोजी मंजूर केल्यानुसार निर्गमीत करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१११११०५०९४३१६००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

.

स्वाक्षरी/-

**(सु.तु. शेंडे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन,**

प्रति,

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, नागपूर.
३. जिल्हाधिकारी, बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर
४. जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी. बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर
५. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन अमरावती, नागपुर आणि लातुर
६. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराषूट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे-१६.
६. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त. बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर
७. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद. बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, वाशिम, वर्धा, नांदेड, हिंगोली, उस्मानाबाद आणि लातुर
८. अवर सचिव, पदुम-४/कक्ष अधिकारी पदुम-१/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती.